उद्योग संचालनालय, मैत्री कक्ष, उपविभागीय कार्यालये आणि जिल्हा उद्योग केंद्राकरीता वाहन अनुज्ञेय करण्यास तसेच वाहने भाडेतत्वावर घेण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०१८/१७/प्र.क्र.११/उद्योग-३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १७ एप्रिल, २०२३

**वाचा -**

१) वित्त विभाग शासन निर्णय क्र. : वाहन-१०००/ प्र.क्र.६५/२००१/ विनियम, दि.१०.०९.२००१
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. : वाहन-२०१४/ प्र.क्र.३६/१४/ विनियम, दि.२२.०८.२०१४
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.: वाहन-२०१७/ प्र.क्र.४१/१७/ विनियम, दि.२८.०७.२०२०
४) उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.:भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६
५) उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.:संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७
६) उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.:इएसटी-३४१८/प्र.क्र.६२/उद्योग-३, दि.११.०२.२०२२
७) उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.:इएसटी-३४१४/६२२/प्र.क्र.९३/उद्योग-३, दि.२६.१०.२०१६
८) उद्योग संचालनयालचे पत्र क्र. १. उसं/प्रशासन/मा.विआ (उ)/वाहन खरेदी/ २०२२/अे-१२०८, दि.०७.११.२०२२
९) उद्योग संचालनयालचे पत्र क्र.१. उसं/प्रशासन/मा.विआ (उ)/वाहन खरेदी/ २०२२/अे-१२०६, दि.०७.११.२०२२
१०) उद्योग संचालनयालचे पत्र क्र.१. उसं/प्रशासन/मा.विआ (उ)/वाहन खरेदी/ २०२२/अे-१२०७, दि.०७.११.२०२२

**प्रस्तावना :**

वित्त विभागाच्या शासन निर्णय संदर्भ क्र. १ व २ नुसार शासकीय व इतर कार्यालयातील वाहनाच्या वापरासंबंधीचे धोरण निश्चित करण्यात आलेले असून प्रशासकीय विभागाने विभागातील व अधिपत्याखालील कार्यालयातील वाहनांचा आढावा घेण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. उद्योग संचालनालयांतर्गत नवीन औद्योगिक धोरणांची अंमलबजावणी, त्यानुषंगाने इतर सर्व प्रकारची कामे करण्यात येतात. सदर कामास गती येण्याकरीता उद्योग संचालनालयातील नविन पदांसाठी नविन वाहने अनुज्ञेय करुन निर्लेखित केलेल्या ५७ वाहनांच्या बदली नविन वाहने खरेदी करण्यासाठी राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने दिलेल्या मान्यतेनुसार वाहन अनुज्ञेय करण्याची व वाहने भाडेतत्वावर घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उद्योग संचालनालयांतर्गत मैत्री कक्ष, विभागीय स्तरावरील विभागीय कार्यालये यांना वाहन आढावा समितीने दिलेल्या मान्यतेनुसार एकूण ४५ वाहने अनुज्ञेय करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. त्यापैकी खालील तक्त्यातील एकूण १० नवीन वाहने अनुज्ञेय करण्यात येत असून उर्वरीत ३५ वाहने भाडेतत्वावर घेण्यास अनुज्ञेय करुन खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकारी व कार्यालयाचे नाव | वाहन संख्या | वाहन उपलब्धतेचा प्रकार | शा.नि.२८.०७.२०२० नुसार निश्चित करण्यात आलेली वाहन किंमत मर्यादा |
|---|---|---|---|---|
| १ | विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई (मुख्यालय) | १ कार | नविन वाहन खरेदी | **रु. १० लाख** (वाहनाची किंमत+वस्तु व सेवा कर+ टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+ सहाय्यभूत साहित्य इ. अंतर्भूत करुन एकूण रु. १०.०० लाख मर्यादा) |
| २ | अतिरिक्त विकास आयुक्त (उद्योग), मैत्री कक्ष, मुंबई | १ कार | नविन वाहन खरेदी | **रु. ८ लाख** (वाहनाची किंमत+वस्तु व सेवा कर+ टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+ सहाय्यभूत साहित्य इ. अंतर्भूत करुन एकूण रु. ८.०० लाख मर्यादा) |
| ३ | अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई (मुख्यालय) | १ कार | नविन वाहन खरेदी | **रु. ८ लाख** (वाहनाची किंमत+वस्तु व सेवा कर+ टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+ सहाय्यभूत साहित्य इ. अंतर्भूत करुन एकूण रु. ८.०० लाख मर्यादा) |
| ४ | उद्योग सह संचालक, मुंबई प्रादेशिक विभाग, मुंबई | १ कार | नविन वाहन खरेदी | **रु. ८ लाख** (वाहनाची किंमत+वस्तु व सेवा कर+ टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+ सहाय्यभूत साहित्य इ. अंतर्भूत करुन एकूण रु. ८.०० लाख मर्यादा) |
| ५ | उद्योग सह संचालक (विभागीय कार्यालय औरंगाबाद, ठाणे, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती) | ६ कार | नविन वाहन खरेदी | **रु. ८ लाख** (वाहनाची किंमत+वस्तु व सेवा कर+ टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+ सहाय्यभूत साहित्य इ. अंतर्भूत करुन एकूण रु. ८.०० लाख मर्यादा) |
| ६ | सर्व जिल्हा उद्योग केंद्र (नवीन पालघर जिल्ह्यासह) व मुख्यालय मुंबई | ३५ जीप | भाडेतत्वावर | **रु. ८ लाख** (वाहनाची किंमत+वस्तु व सेवा कर+ टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+ सहाय्यभूत साहित्य इ. अंतर्भूत करुन एकूण रु. ८.०० लाख मर्यादा) |
| | **एकूण** | **४५** | | |

२. उपरोक्त तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भ क्र. ६ अन्वये मैत्री कक्षाकरीता नव्याने निर्माण करण्यात आलेल्या अतिरिक्त विकास आयुक्त (उद्योग) यांना एक वाहन (कार) तसेच संदर्भ क्र. ७ च्या अनुषंगाने नव्याने निर्माण करण्यात आलेल्या पालघर जिल्ह्याकरीता नवीन जिल्हा उद्योग केंद्राकरीता एक वाहन (जीप) अनुज्ञेय

करण्यात येत आहे. तसेच यापूर्वीच्या वाहन आढावा समितीत उल्लेखित नसलेल्या अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांना एक वाहन (कार) अनुज्ञेय करण्यात येत आहे.

**३. अटी व शर्ती :**

१. उपरोक्त संदर्भ क्र. ३ अन्वये वित्त विभागाकडून विहीत करण्यात आलेल्या सूचनांचे कटाक्षाने पालन करावे.

२. उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार मुख्यालय, मुंबई आणि जिल्हा उद्योग केंद्रांसाठी वाहन भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्याची कार्यवाही विहीत कार्यपद्धतीनुसार त्या त्या कार्यालयाकडून करण्यात यावी व त्याबाबतचा कार्यपालन अहवाल एकत्रितरित्या विकास आयुक्त (उद्योग) यांचेमार्फत शासनास सादर करावा.

३. उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार एकूण १० नवीन वाहने खरेदी करण्याचा प्रस्ताव निधीची उपलब्धता विचारात घेऊन विकास आयुक्त (उद्योग) यांनी शासनास तात्काळ सादर करावा.

४. सदर वाहन अनुज्ञेयता तसेच भाडेतत्वावर वाहन उपलब्ध करुन देण्यास यापूर्वी नविन वाहन खरेदी करण्यात आलेली नाही, या अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

५. वाहन अनुज्ञेय असणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या वापरात फक्त एकच वाहन असावे तसेच प्रत्येक जिल्हा उद्योग केंद्रासाठी एकच वाहन भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेता येईल.

६. निर्लेखित झालेल्या वाहनाचा पुन्हा वापर करण्यात येऊ नये, तसेच निर्लेखित वाहनांची विहित कार्यपद्धतीनुसार विल्हेवाट लावण्याची कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४०/२०२३/विनिमय, दि.०७.०२.२०२३ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या संमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१७१८२७२३८६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276, pseudonym=ECC424589A881E3E8CAB5C4F3152EABAEE38E22E, serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2023.04.17 18:33:50 +05'30'

**(शशांक चव्हाण)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई- ४०० ०३२

२. अतिरिक्त विकास आयुक्त (उद्योग), मैत्री कक्ष, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-४०० ०३२.
३. विभागीय कार्यालये, ठाणे/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
४. उपविभागीय कार्यालय, नांदेड
५. सर्व जिल्हा उद्योग केंद्रे, उद्योग संचालनालयाद्वारे
६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, /निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९. उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१६ / अर्थसंकल्प-१४/विनिमय), मंत्रालय, मुंबई-३२.
१०.उपसचिव ( प्रशासन-१/४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.निवडनस्ती उद्योग -३.